**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील**
**अधिका-यांच्या बदल्या / नियुक्त्या.**

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०१०/प्र.क्र. ३१/ आस्था-३
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १ फेब्रुवारी, २०११

**संदर्भ :-** १) शासन आदेश क्र.मविसे१०/२००८/प्र.क्र.२५२/आस्था-३ दि.३०.१.२०१०
२) शासन ज्ञापन क्र.मविसे१०/२०१०/प्र.क्र.३१/आस्था-३ दि.३१.३.२०१०
३) श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल यांचा दि.२३.१२.२०१० आणि दि.१२.१.२०११ चे विनंती अर्ज

**आदेशः-**

संदर्भाधिन शासन ज्ञापन क्र.२ अन्वये श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल, तत्कालीन परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद भंडारा यांना महाराष्ट्र नागरी सेवा रजा नियम १९८१ मधील नियम ६३ (२) (एफ) मधील लोक हितार्थची बाब शिथिल करुन आणि महाराष्ट्र नागरी सेवा रजा नियम १९८१ मधील नियम ६३ अंतर्गत परिशिष्ठ ५ मधील नमुना क्र.६ मध्ये बंधपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून दि.१.२.२०१० ते दि.३१.१.२०११ या एक वर्ष कालावधीची विनावेतन असाधारण रजा मंजुर करण्यात आली होती.संदर्भाधीन क्र.३ च्या विनंती अर्जान्वये श्री.ओसवाल यांनी संदर्भाधीन क्र.२ च्या ज्ञापनान्वये मंजुर केलेल्या रजेस जोडून दि.१.२.२०११ ते दि.३१.१.२०१२ या कालावधीची अतिरीक्त रजा मंजुर करण्याची केलेली विनंती अमान्य करण्यात येत असून शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे,-

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पांडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल, तत्कालीन परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद भंडारा यांना संदर्भाधीन क्र.२ च्या शासन ज्ञापनान्वये मंजुर करण्यात आलेल्या रजेच्या समाप्तीनंतर त्यांची नियुक्ती **गट विकास अधिकारी पंचायत समिती तलासरी जि. ठाणे** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल यांनी वरील पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा अन्यथा शासन आदेशाचे पालन न केल्याच्या कारणास्तव शिस्तभंगाची कारवाई करुन त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०२०११८०८५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

विभागीय आयुक्त (सर्व )
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, (सर्व )
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
श्री.निखिलकुमार पोपटलाल ओसवाल परिविक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी, मु.पो.मसुर, ता.कराड जि.सातारा (रजिस्टर देय डाकेने)
**उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र) जिल्हा परिषद सातारा यांनी संबंधीत अधिका-यास सदर आदेशाची प्रत देऊन त्याची पोहच शासनास उलटटपाली पाठवावी.**
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.